**चांदण्यांचे झाड (कवितासंग्रह)**
**- कमलाकर दत्ताराम म्हाळशी**
Chandanyanche Jhad (Poems)
– KAMALAKAR DATTARAM MHALSHI

**प्रकाशन क्र. १**

सर्वाधिकारः– सौ. पद्‌मजा कमलाकर म्हाळशी
ॐ श्री दत्त, घर नं. २०८,
श्रीस्थळ, काणकोण, गोवा ४०३ ७०२

**पहिली आवृती :**
७ नोव्हेंबर १९९४

**प्रकाशक :**
श्री मिलींद कमलाकर म्हाळशी
ॐ श्री दत्त पद्‌मजा प्रकाशन,
श्रीस्थळ–काणकोण, गोवा ४०३ ७०२

**मुद्रक :**
श्री किशोर विठ्ठल ना. गावकर
राधा प्रिंटींग प्रेस,
चावडी–काणकोण, गोवा

**मुखचित्र :**
गौरीश रमाकांत वेर्णेकर

**किंमत : २५ रुपये**

प्रती : ५०० (पाचशे)

# ती. भाऊ,

भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या क्रांतीकारी पर्वात
शहरापासून अतिदूर अशा श्रीस्थळ गावात
**'श्रीमल्लिकार्जुन सेवक भजनी मंडळ'** नांवाची
सांस्कृतिक, शैक्षणिक संस्था स्थापून गावाची
सामाजिक जाणिवेची कुंडलिनीं जागवताना
आणि शिक्षणाची कवाडे सर्वासाठी खोलताना

**ती भाऊ,**
**तुमच्या दूरदृष्टीने ज्योतिषावरतीही केली कडी**
**म्हणूनच ' चांदण्यांचे झाड ' तुमच्या घरणी घडो घडी! !**

**– कमलाकर**

# पूर्वप्रसिद्धी

- म्हणून तर जगतो आहे – गोमन्तक, १ जानेवारी १९६
- भोगतो मी मुक्त कारावास – गोमन्तक विशेषांक
- भाऊ – कै. भाऊसाहेब बांदोडकर जीवनदर्शन गौरवांक कांचन प्रकाशन, सांगली. सप्टेंबर १९७६
- शिवार पेटलेले - प्राजक्त १९८२
- तुझ्या माझ्या दुराव्याला – गोमन्तक २५ मे १९७५
- मी एक जिवंत प्रेत -- नवोदिता ३ फेबुवारी १९७६
- चांदण्यांचे झाड – नवोदिता १ नोव्हेंबर १९७६
- देव कधी भेटलाच तर – गोमन्तक, दिवाळी १९७६
- वनमहोत्सव – गोमन्तकाची अस्मिता, दिपावली १९८२
- वाटा – संगम, ऑगष्ट १९८६
- खिस्त जन्मा आला –' गोमंन्तक २५ डिसेंबर १९९१
- मूकनायक – गोतन्त्क, १४ एप्रिल १९९२

---

- चमचे हवेत का. चमचे ? - श्री निराकार विद्यालय हाय स्कूल–माजी विद्यार्थी संघटना, माशे- काणकोण आयोजित मराठी–कोंकणी कविता लेखन–वाचन स्पर्धेत मराठी विभागात सर्वप्रथम, २ ऑक्टोबर १९८६.

# अनुक्रमणिका

---

# म्हणून तर -

**'म्हणून तर जगतो आहे'** ही माझी पहिली मराठी कविता १ जानेवारी १९६७ रोजी दै. 'गोमन्तक' मध्ये प्रसिद्ध झाली व त्यानंतर ७ नोव्हेंबर १९९४ रोजी म्हणजेच तब्बल २७ वर्षांनी ती **'चांदण्यांचे झाड'** होऊन माझा मराठीतला पहिला कवितासंग्रह म्हणून वाचकां-समोर येत आहे. उशिराची ही कमाल खरीच! पण उशीरा येऊनही आपल्या नुसत्या आगमनानेही प्रसन्न शिडकाव्याची हिरवळ मानसभू-मीवर रुजवणाऱ्या पावसात भिजण्याचा आनंद आज मला स्वतःला होत आहे. वाचकराजाला प्रसन्न करण्यात माझ्या या कवितासंग्रहांतले चार-दोन शब्द-कण पत्रं, पुष्पं, फलं, तोयं रुपाने कारणी लागले तर मी स्वतःला धन्य समजेन.

तसं माझं पहिलं पुस्तक (कोंकणी) 'मनीसपणाचो ताज- जमना-लाल बजाज' डिसेंबर १९९२ मध्ये **'अपुरबाय प्रकाशन'** वळवय ह्या प्रकाशन संस्थेमार्फत प्रकाशक सौ. हेमा पुंडलीक नायक ह्यांनी प्रकाशित केलं व त्या चरित्र पुस्तकाला कोंकणी भाशा मंडळाचा १९९२ सालचा स्व. नरसिंह दामोदर नायक पुरस्कारही लाभला. असे असले तरी 'चांदण्याचे झाड' ची अपूर्वाई उल्लेखनीय आहेच. कारण मूळात दर एकाचं दर एक पुस्तक हे त्या त्या वेळी तसं पहिलंच असत. शिवाय 'चांदण्यांचे झाड' हे माझं मराठीतलं पहिलंच पुस्तक आहे. अर्थात्, वाचकराजासाठी आता ते पूर्णपणं खुलं झाल्यानं त्याचा आस्वाद घ्यायला जसा तो मुक्त आहे, तसाच साहित्य क्षेत्रातली त्याची जागा, ठरविण्याचा अधिकारही त्याचाच. दर्जाचं मग वाटल्यास समीक्षक बघून घेऊ दयात. माझ्यापुरतं बोलायचं झाल्यास–पण ते काम माझे परममित्र डॉ. सोमनाथ कोमरपंतनी अत्यंत आत्मीयतेनं केल्यामुळं मी त्याबाबत न बोलणंच बरं, तरींही मी एवढंच म्हणेन की 'चांदण्यांचे झाड' मधल्या कविता म्हणजे काहीं प्रतिभावंताचा स्फूर्तीदायी कलाविष्कार नव्हे की काव्यात्म ब्रम्हानंदाचा आत्माविष्कारही नव्हे. सातत्याने घर, गांव आणि माणसांच्या समाजाबरोबर माणसांत वावरतना प्रभावित आणि उत्तेजित झालेल्या भावनेला प्रामाणिक शब्दांद्वारे मोकळी करून दिलेली वाट म्हणजे माझी कविता. चादण्यांचे झाड' बुद्धीद्वारे

चालना मिळालेल्या सामाजिक विचारमंथनाला विविध अनुभवांद्वारे शब्दरुप देण्याची कृती म्हणजे माझी कविता आणि माझ्यावर प्रभाव पाडणाऱ्या व्यक्ती–संस्थांच्या स्वभाव विशेषांना शब्दरूप देण्याचा प्रामाणिक प्रयत्न म्हणजे माझी कविता. थोडक्यात, माझी कविता ही बहुतांशी प्रासंगिक आहे, एखादया कार्यक्रमासाठी रचना हवी म्हणून लिहिलेली प्रासंगिक कविता आहे आणि लिहिल्याशिवाय राहवतच नाही म्हणून लिहिलेलीही कविता आहे.

वास्तविक पाहता श्रीस्थळच्या श्रीमल्लिकार्जुन सेवक भजनी मंडळाच्या श्री मल्लिकेश विद्यालयामार्फत सेंत्रु प्रोमोतोर द् इंस्त्रुसावच्या श्री मल्लिकार्जून विद्यालय हायस्कूलमध्ये १९५९–६० च्या शैक्षणिक वर्षात सातवीच्या परिक्षेसाठी प्रवेश घेतल्यापासूनच कविता लिहिण्याचा छंद मला जडला होता. अर्थात, पुढे थोडीफार जाण आल्यानंतर प्रयत्नपूर्वक पाडलेल्या अगोदरच्या बहुतेक कविता मी फाडूनही टाकल्या, तरीही भर दुपारच्या उन्हातून धुळीच्या तांबड्या रस्त्यावरुन (बऱ्याच वेळा अनवाणी पायांनी) हायस्कूलमधून घरी परतताना, धुळीचा रस्ता ओलांडताना तळमळणारे गांडूळ पाहून भावनोत्कटतेने झालेली कविता अजूनही डोक्यातून जात नाही.

**का तडफडशी दीनदयाळा गांडूळा**
**नच कुणाची नजर तुजप्रती रे गांडूळा**

अशा त्या कवितेच्या प्रारंभीच्या ओळी होत्या. खेडेगांवातून पावसाळ्याच्या दिवसांत गळाद्वारे मासे मारण्यासाठी गांडूळांचा सर्रास वापर केला जातो, म्हणूनच गांडूळांची कीव येऊन रस्त्यावर तळ–मळत मरणाऱ्या त्या गांडूळाला मी तडफडणारा 'दीनदयाळू' गांडूळ म्हणालो होतो.

'म्हणून तर जगतो आहे' ही माझी प्रसिद्ध झालेली पहिली कविता देखील अशाच उत्कट भावनेच्या स्फोटातून जन्माला आली ! अर्थात् तिच्या मुळाशी अन्यायाविरूद्धची जळजळीत चीड होतीच, शिवाय समाजरचनेत, समाजमनांत झटक्यात क्रांतीकारी बदल कर–ण्याची हिंमत, कुवत आपल्यात नाही म्हणून फिरुन फिरुन येणारी

कमालीची अस्वस्थता होती, पण सोबत महत्वाकांक्षेच्या साफल्यासाठी धीर धरुन वाट बघण्याची मनाची तयारीही होती.

अर्थात, नंतरच्या काळात 'गोमन्तकचे' संपादक माधवराव गडकरी ह्यांनी पत्रकार ह्या नात्यानं गोव्यातल्या तरुणवर्गामध्ये कमालीची जागृती घडवून त्यांना लिहिण्यास प्रवृत्त केलं होतं हे मान्य करावंच लागेल, भले त्यांची राजकीय मते काहीही असोत, कोंकणीच्या संदर्भातली त्यांची कडवी विरोधी भूमिकाही कोंकणी माणसाला चीड आणणारी वाटो ! पण लेखनप्रवृतीच्या ह्या प्रक्रियेसाठी पुढे गोमन्तक साहित्य सेवक मंडळाची शाखा काणकोणमध्ये स्थापणाऱ्या काही मोजक्या मान्यवरांमध्ये व मोजक्या तरुणांमध्ये माझाही सहभाग राहिला व पुढे काणकोण शाखेचा सरचिटणीस नात्याने प्राचार्य रा. शा. ग्रामोपाध्येंच्या अध्यक्षतेखाली अनेक उपक्रम राबवून मंडळाचा कारभार यशस्वीरित्या पुढे नेण्यास त्या काळात माझाही हातभार लागला त्याची आठवण आज पुन्हा एकदा करुन देणं मी गरजेचं मानतो, कारण ह्या अशा प्रक्रियेमुळेच माझं मराठी 'लेखन' वाढायला व महाराष्ट्र परिचय केंद्राचे मुख्याधिकारी प्रभाकर भुसारी सारख्यांमुळे माझं मराठी 'कथन' प्रभावीरित्या पुढे यायला मला मदत झाली.

पण मूळात ह्या अशा साहित्यिक गुणांची बीजं माझ्यात कोणी पेरली असतील ? ह्या प्रश्नाला मात्र एक अणि एकच उत्तर असू शकतं ते म्हणजे माझ्या शाळेन माझ्या शिक्षकानी. श्रीमल्लिार्जुन सेवक भजनी मंडळ संचालित श्री मल्लिकेश विद्यालय आणि सेंत्रु प्रमोत्तोर द् इस्त्रुसाव संचालित श्री मल्लिकार्जुन विद्यालय हायस्कूल ह्या दोन शैक्षणिक संस्था आणि तिथला शिक्षकवर्ग ह्यांच्या ऋणातून कधी मुक्त होऊच नये असं मला आजही वाटतं. विशेषत: श्रीस्थळ गावात आपल्या सहका-यांच्या मदतोने शिक्षणाची मुहूर्तमेढ शिस्तबद्धरित्या रोवणारे मा. भाऊ उर्फ केशव अनंत जोशी व कृष्ण माझी माता, कृष्ण माझा पिता, बहीण बंधू चुलता कृष्ण माझा असे माझे सातवी पर्यंतचे पूज्य 'मास्तर' उर्फ श्री. विनायक गणेश आमशेकर. मला प्रारंभीचे प्राथमिक शिक्षणाचे धडे गिरवायला घालणारे शिक्षक श्री. सुरेश अग्नी ह्यांचाही समावेश ह्यांत आहेच. परमपूज्य आईवडिलांप्रमाणे थोरले

बंधु 'भाऊ' चंद्रकांत म्हाळशी आणि गावची व अवतीभंवतीची मित्र-मंडळीही ह्या काळात मला प्रभावित करुन गेली आहे.

श्री मल्लिकार्जुन विद्यालय हायस्कूलामध्ये जे जे शिक्षक म्हणून भेटले, त्यातून या ना त्या कारणाने मला प्रभावित करणारे व व माझ्यावर नकळत संस्कार घडवणारे म्हणून जे शिक्षक आजही प्रकर्षाने आठवतात, डोळ्यासमोर उभे राहतात, ते म्हणजे कडक शिस्तीचे, कमालीचे अभ्यासू शिक्षक नाईक मास्तर म्हणजेच श्री. यशवंत नाईक गुरुजी.* त्या काळात आमच्या वर्गावर न येताही आमच्यावर प्रभाव पाडणारे व विद्यार्थ्यामध्ये वचक निर्माण करणारे शिक्षक म्हषून (परिक्षेच्या व्यतहाराची जबाबदारी सांभाळीत असल्यामुळे असेल किवा स्वातंत्र्यसैनिक शिक्षक म्हणून ही असेल कदा-कांता मास्तर उर्फ श्री कान्होबा भैरेली बद्दल खास असा आदरभाव मनात वसूल राहिला होता, तो आजही कायम आहे. खरं म्हणजे श्री मल्लिकर्जुन विद्यालय, हायस्कूलची नुसती आठवणही माझ्या-सारख्यांना स्फुर्तीदायी वाटते, कारण, आमच्या आयुष्यातले ते खऱ्या-खुऱ्या अर्थाने मंतरलेले क्षण होते! पुढे कारवारच्या केशव. गजानन सबनीस कॉलेज मध्ये प्रा. पतंगे नांवाच्या अभ्यासपूर्ण, शैलीदार वक्तृ-त्वाच्या व्यक्तीमत्वानं प्रभावित केलं, तर शिक्षक प्रशिक्षण महाविद्या-लयामध्ये प्रा. गिरीश करंदीकरनी तर्कसंगत आणि मूद्देसूद लेखनाच त्र आत्मसात करावं तर ते प्रा. करंदीकरकडूनच, अलीकडे योगा-योगायोगानेच माझे जुने शाळामित्र व ह्या नां त्या कारणाने सतत संपर्कात राहिलेले परमित्र डॉ. सोमनाथ कोमरपंतचा गोवा विद्या-पिठातला मराठी विषयांतला विद्यार्थी होण्याची संधी मिळाली व अभ्यासू वृत्तीने मी भारावून गेलो. मराठी साहित्यातला आनंद लुट-ण्याची संधी मला प्राप्त करुन देणाऱ्या शिक्षकांची व हितचिंतकांची ही काही प्रातिभनधीक स्वरुपाची नांवंचे त्यानतरच्या काळात कोकणीते कार्यकर्ते आर. बी. एम् उर्फ श्री रमेश बाबय कोमरपंतमूळे मी कोंकणीकडे ओढला गली व कोकणी कवी नागेश करमलीमुळे कोंकणी-तल्या सांस्कृतिक कार्यक्रमाद्वारे साहित्याकडे वळलो त्यानंतर कोंकणी कथाकार चंद्रकांत केणी कथाकार व नाटककार श्री. पूंडलिक नारायण

*आणि मुख्याध्यापक ह. रा. प्रभू.

नायक व साहित्यिक, पत्रकार अँड. उदय भेंब्रे ह्यांच्या आत्मिय तेच्या मार्गदर्शनामुळे मी कोंकणीच्या साहित्यक्षेत्रात पाऊल ठेवलं मात्र हें सारे करताना हंसक्षीरन्यायानेच मी मराठी-कोंकणी वादाकडे पाहिलं आणि आज तो संपलेला आहे, असं धरूनच माझं लेखन मी चालू ठेवलेलं आहे.

गोव्याची संस्कृती राखून ठेवण्यात मराठीनंच हातभार लावल्याचीही अनेकवेळा सांगितलं जातं, 'मराठीनच, च्या जागी मी 'मराठीनंही' म्हणेन, कारण, गोव्याची भारतीय संस्कृती टिकवून कोंकणीनें जास्त हातभार लावला, अस लोकवेदाचा एक नम्र विद्यार्थी या नात्यानं प्रामाणिक मत आहे असं असूनही मराठी भजनं व मराठी नाटक गोव्यात काल होती, आजही आहेत व काल–आजप्रमाणेच उदयाही आम्ही त्याचे अविभाष्य घटक असू त्याबद्दल मांझ्या मनात तीळमात्र शंका नाही पण क्रमश: टप्याटप्यान बहुसंख्य कार्यक्रमाची व नाटकांची जागा कोंकणी घेईल व तिनं ती जरुर घ्यावी अस मला वाटतं दुदैवानं आमच्यातले अनेकजण 'माध्यम भाषा' म्हणजेच 'मातृभाषा' या गोड गैरसमाजाचे बळी ठरले! कोंकणी–मराठी वादचांणी (प्रेमोनी नव्हे!) त्याला उत्तम पैकी खतपाणी घातले व वाद त्रिकोपाला नेऊन गोव्यात एका पिढीच्या साहित्यनिर्मीतीचा वटवृक्ष अंकुरलाच कोमेजूनही गेला!

'चांदण्यांचे झाड' एवढया उशिरानं वाचकांसमोर येण्याचं हेही एक कारण असण्याची शक्यता मी तरी नकारत नाही. पुस्तक प्रकाशना साठी गरजेच्या आर्थिक सहाय्याचा अभाव ही बाजू तर आहेच. दरम्यान १७ मे १९९४ रोजी नव्यानंच स्थापन झालेल्या ॐ श्री दत्त पद्मजा प्रकाशन ह्या काणकोण तालुक्यातच पहिल्याच प्रकाशन सस्थेने 'चांदण्यांचे झाड' प्रकाशित करण्याचे ठरवले. चिरंजीव मिलींद म्हाळशी ह्यानं 'प्रकाशक' ह्या नात्यानं हे पुस्तक प्रकाशित करुन पितृऋण फेडण्याचा प्रयत्न केला, तरी पदार्पणातच दाखविलेल्या या धाडसाबद्दल त्यांचं कौतुक करायलाच हवे. पुस्तकासाठी तयार केलेलं हस्तलिखित परममित्र डॉ. सोमनाथ कोमरपंत ह्यांनी पाहिलं, आवश्यक सूचना केल्या व प्रस्तावनही लिहून मला आभारात ठेवलं, माझे मित्र व राधा प्रिंटींग प्रेसचे मालक श्री. किशोर विठ्ठल नाईक गावकरशी मी छपाईच्या संदर्भात बोललो तर त्यानी अयंत्त जिव्हा–

ळयाने हे काम स्विकारलं व कमी वेळात श्री. महादेव बाबूराव नेमजी व सहकारी श्री. मनोहर श्रीराम शहापूरकर यांच्या सहकार्याने रात्रं दिवस खपून उत्तम छपाई करुन देऊन आपला शब्द पाळला. मी या सर्वांचा ऋणी आहे. सम्राट प्रिंटर्सचे श्री. श्रीकांत आमोणकर यांनी आपल्या कर्मचाऱ्यांच्या सहकार्यनें पुस्तकासाठी सुंदर कव्हरची छपाई करुन दिली, म्हणून मी त्याचाही आभारी आहे. माझा विद्यार्थी गौरीश रमाकांत वेर्णेकरनं मी सोपवलेली मुखपृष्ठाच्या चित्राची आव्हानात्मक जबाबदारी पेलली ! अभिनंदन गौरीश.... वाचकराजा, 'चांदण्यांचे झाड' एवढ्यायतच मंडळीचे आहे. असं मात्र समजू नकोस ते तुझही आहे; नव्हे खरं तर तुझ्यातून रुजून वाडलेलं म्हणून तुझ्यासाठीच आहे. त्यावर हक्क फक्त तुझाच. म्हणून तुही महत्वाकांक्षेतून अखेर म्हणावे-म्हणून तर जगतो अहे जगून सारे बघतो आहे.

ॐ श्री दत्त,

श्रीस्थळ–काणकोण, गोवा. **–कमलाकर दत्ताराम म्हाळशी**

# आल्हाददायी ' चांदण्यांचे झाड '

माझे दीर्घकालीन जिवलग स्नेही श्री. कमलाकर दत्ताराम म्हाळशी यांचा ' चांदण्यांचे झाड ' हा कवितासंग्रह तन्मयतेने वाचला. वेगवेगळ्या नियतकालिकांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध व्हायच्या, त्या मी वाचीत असे. त्यांच्या कवितेतील सामाजिक जाणीव मला भावलेली होती. ' चांदण्यांचे झाड पुस्तकरुपाने येणार आहे. तू त्याव र लिहावे ' असे त्यांनी सुचविले. मी या गोष्टीला संमती दिली.

' चांदण्यांचे झाड ' हा श्री. कमलाकर दत्ताराम म्हाळशी यांच्या आजवरच्या जीवन चितनाचा हृदयंगम आविष्कार आहे हे ' झाड ' एकाएकी ' चांदण्यांनी ' लखडलेले नाही. या ' झाडाने तप्त सूर्याचा लाव्हा झेललेला आहे. जीवनानुभवांच्या मुशीतून हे ' झाड ' प्रगल्भ झालेले आहे.

' चांदण्यांचे झाड ' वाचताना उण्यापुऱ्या पस्तीस वर्षाच्या सहप्रवासातील अनंत आठवणी जाग्या झाल्या· स्वतःला आणि माझ्या मित्राला अलिप्त ठेवून मला या कवितांचा आस्वाद घेताच येईना. त्यांची कविताच जणू आवाहन करायला लागली ' एकवेळ माझ्या रुपकळेकडे लक्ष गेले नाही तर चालेल; पण अनुभवाकडे पहा.' ' चांदण्यांच्या झाडाला ' आत्मनिष्ठेचा प्रांजळ सूर लाभलेला आहे. सामाजिक जाणिवेचे डोळस अधिष्ठान आहे. श्रद्धास्थानांच्या ओलाव्याने हे झाड परिपुष्ट झालेले आहे. राष्ट्रीय विचारांच्या मंत्रजागरामुळे हे झाड भावमंत्रित झालेले आहे हे झाड स्पंदनशील आहे, संस्कारबहुल आहे. स्वप्न–वास्तवाच्या हिंदोळयावर झोके घेत, ऊन–पावसाचा मारा सहन करीत हे झाड आपल्याच मस्तीत आपल्या अंगभूत सौंदर्याच्या अनेक कळांनी रसिकांना आल्हाद देत आहे. अंतर्मुख करीत आहे.

श्री. कमलाकर म्हाळशी हे श्रीमल्लिकार्जुनाच्या वास्तव्याने पुनित झालेल्या श्रीस्थळच्या रमणीय निसर्गाच्या परिसरातलेल्या संपन्न निसर्गाचा बाळपणापासून त्यांच्यावर संस्कार झालेला. १९५९

साली श्रीं. मल्लिकार्जुनन विद्यालय–हाल्स्कूलमध्ये विद्यार्थी म्हणून ते आले आम्हा सगळयांची जडणघडण समांतरपणे झाली. ध्येयवादी. तन्मयतेने शिकवणारे शिक्षक आम्हाला लाभले. दिवस तसे खडतर होते. पण ते आम्हाला तसे भासले नाहीत. आमच्या आयुष्यातील ते मंतरलेलें दिवस होते. आजही मागे वळून पाहताना धन्यता वाटते, या सुखदु:ख संमिश्र कटू गोड अनुभवांच्या पाऊलखुणा या कवितासंग्रहात अधूनमधून आडळतात, एवढयापुरता हा वैयक्तिक संदर्भ आवश्यक वाटला.

श्री कमलाकर म्हाळशी यांच्या व्यक्तिमत्वाला अनेक पैलू आहेत. लहानपणापासून त्यांना लेखनाची आवड. शाळेच्या 'उदय' वार्षिकात ते लिहीत असत. पुढे त्यांना कवितेचा छंद जडला, अखंडित वाचनाचे त्यांच्या कविमनावर संस्कार झाले. अवतीभोवतीच्या विसं–वादी समाजरचनेचे ओरखडे या मनावर उमटले. पुढे सार्वजनिक क्षेत्रात–बामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रात ते हिरीरीने भाग घेऊ लागले. राष्ट्रीय पुनर्जागरणाच्या कार्यात ते आघाडीवर राहिले. साने गुरुजींच्या संस्कारित झालेल्या परियाराचे ते घटक झाले. 'धडपडणाऱ्या मुलांचा' वारसा त्यांनी आपल्या शक्तींनुसार, निष्ठेने आणि परिश्रमपूर्वक चालविला आहे. ते निष्ठावंत शिक्षक आहेत. काल–परवापर्यंत त्यानी अध्यापन केले. या प्रदिर्घ वाटचालीत त्यांना मी आणि आपण यांमधील अनुबंध आकळले. मी आम्ही मधील द्वैत फिटले. या अनुभवाती 'चादण्यांच्या झाडाला' समाष्टिजीबनातील सुखदु:खाचाही स्पर्श झालेला आहे.

जीवनावस्तवाच्या खडकाशी टक्कर देत असताना श्री. कमलाकर म्हाळशी यांनी कवितेची चंद्रवेल सुकू दिली नाही तिला पालवी कुटली, सुंदर फुलेही आली–कष्टातून जोजविलेंल्या कवितेशी हृदयसंवाद करताना ते म्हणतात.

..कविते, माझ्या छंदामुळे तुझे छंद खूंटले !
माधुकरीचा मधुकर मी, तुला अलंकार कुठले ?

आपल्या काव्यमर्यादाचे त्यांना भान आहे, तरीही अंत:प्रेरणेने आपण

काव्य करीत राहिलो' जीवनानुभव प्रकट करीत राहिलो. याविषयीची वाजवी जाणीवही– व्यक्त झाली आहे.

कविते, माझ्या दारिद्र्याच्या वास्तववादाचा
तू नागडा उघडा स्वच्छंद
जीवनसुलभ धुंद मस्तीचा आविष्कार
केवळ मुक्तछंद !

हीच आत्मनिष्ठ वृत्ती त्यांच्या,
'म्हणून तर जगतो आहे' या कवितेत उत्कटपणे व्यक्त झालेली आहे. तीत सांप्रतची अगतिकता आहे. पन मन संपूर्णतः निराश झालेले नाही. उज्वल भविष्यकाळ या मनाला खुणावतो आहे. 'भोगतो मी मुक्त कारावास' मध्ये वास्तव जीवनातील यातनाचक्रावरील मर्मस्पर्शी भाष्य आहे.

पिऊन टाकतो निःश्वास
आभाळधरतीमधला श्वास
तेजोगोलाभोवतालचा प्रवास
भोगतो मी मुक्त कारावास

श्री कमलाकर म्हाळशी यांच्या मनःपिंडाचे पोषण राष्ट्रवादी विचारांनी झालेले आहे. राष्ट्रजीवनातील हर्षामर्शाशी ते चट्‌कन समरस होतात. आणि या विचारांची धारा 'चांदण्यांचे झाड' मध्ये अभिव्यक्त झालेली आहे. राष्ट्रीय जीवनात समर्पित भावनेने कार्य केलेल्या प्रज्ञावंतांविषयी त्यांच्या अंतःकरणात नितांत आदराची भावना वसत आहे. या श्रध्दास्थानांचा गौरव त्यांनी विनम्र भावनेने केलेला आहे. या प्रातःस्मरणीय व्यक्तींनी राष्ट्रजीवनाच्या अभ्युदयाचा मार्ग दाखवून दिला, म्हणून आमच्या पिढीला आत्मनिर्भरशीलतेने पुढची वाटचाल करण्याची प्रेरणा मिळाली अशी त्यांची प्रांजळ भावना आहे. श्री म्हाळशी हे ध्येयनिष्ठ शिक्षक असल्यामुळे आपल्यावर झालेला संस्कार त्यानी काव्यरुपाने पुढच्या पिढीपर्यंत संक्रमित केलेला आहे.

लोकमान्य टिळक आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर या राष्ट्रपुरुषांच्या कार्याचा समुचित शब्दांत त्यानी गौरव केलेला आहे.

'सीमेवरच्या शूर वीरांनो' या कवितेत शत्रूंशी झुंज देणाऱ्या शूर सैनिकांना कृतज्ञतेची अंजली वाहिलेली आहे. स्वतः तापत्रय सोसणारा पण जगाला मुक्तीचा मार्ग दाखविणारा कारुण्यमूर्ती येशू ख्रिस्त कवीला वंदनीय वाटतो. त्याच्यावरील 'मानुषरुपे देव भूवर' आणि ख्रिस्त जन्मा आला' या दोन कविता या संग्रहात आहेत.

गोव्याचे पहिले लोकनियुक्त मुख्यमंत्री आणि गोमंतकीय लोकमानसात प्रेमादराचे स्थान मिळविलेले भाऊसाहेब बांदोडकर यांचे आकस्मिक देहावसान झाल्यावर सर्वत्र दुःखाची लाट पसरली त्यांच्याविषयीचा लोकमानसातील भाव आणि कविमानसातील आत्मीय भाव 'भाऊ' या कवितेत प्रकटला आहे.

झुंजार संपादक आणि साहित्यिक माधवराव गडकरी यांनी गोव्याच्या वास्तव्यात येथील वाङ्मयीन व सांस्कृतिक क्षेत्रात चैतन्य निर्माण केले. अनेक युवकांच्या स्पंदनांना अभिव्यक्ती मिळण्यासाठी त्यांनी हिरीरीने प्रयत्न केले. गोवा सोडून मुंबईच्या व्यापक क्षेत्रात ते पुन्हा गेले त्यावेळी,. कवीने त्यांच्याविषयी आदराची व आत्मीयतेची भावना... 'शुभास्ते पंथानः सन्तु' या कवितेतून व्यक्त केली.

'चांदण्यांचे झाड' मध्ये अशा अनेक भाववृत्तीचे विलोभनीय इंद्रधनुष्य आहे. जीवनातील अनेक रंगच्छटांचे त्यात दर्शन घडते... आत्मसंवाद करणाऱ्या, जीवनाचें सिंहावलोकन करणाऱ्या कविता या संग्रहात आहेत. वास्तव जीवनातील विरुपतेवर भाष्य करणाऱ्या कविता आहेत. भोगलेल्या व्यथांतून या कवीला चिंतनाचा सूर गवसला आहे. नव्या-जुन्या अभिव्यक्तीच्या वळणा वकणांचा फार विचार न करता हृदयी चेगूज उत्स्फूर्तपणे सांगण्याचा प्रांजळ प्रयत्न येथे केलेला आहे. प्रियेशी केलेला हृदयसंवाद आहे.

'चांदण्यांचे झाड' प्रकाशित होत आहे. श्री. कमलाकर म्हाळशी यांचा मित्र या नात्याने त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाकडे व सामाजिक क्षेत्रातील त्यांचा विधायक कार्याकडे मी प्रेमादराने पाहत आलेलो आहे. त्यांचा पुढचा साहित्यप्रवास असाच समृध्द व्हावा. समाजपुरुषाची त्यांच्याकडून उत्तरोत्तर अशीच उत्तम सेवा घडावी ही अंतःकरणपूर्वक शुभेच्छा !

बी ९ स्टाफ क्वार्टर्स,
गोवा विद्यापीठ,
ताळगाव पठार, गोवा.
४०३२०३.

**– सोमनाथ कोमरपंत**

# १. म्हणून तर जगतो आहे !

मावळतीचा सूर्य उगवेलच उगवेल,
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.

कालचक्र सतत फिरते आहे,
तसेच भ्रमण चालले आहे.
वाट चुकलेला निष्पाप जीव,
स्वत:भोवती फिरतो आहे.
चाचपडता चाचपडता वाट मिळेल,
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.

दृष्टीपुढे सारे येते,
ऐकू येते सारे काही,
'आ' वासून पाहतो आहे,
'ओ' देता येत नाही,
म्हणून सारखा तळमळतो आहे.
तहानलेल्या चातकाची तृषा भागेल कधी तरी
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.

बेचव अन्न, निरस जीवन,
शुष्क वाळवंटी भटकतो आहे.

अत्र–तत्र–सर्वत्र मृगजळ, माया
प्रेमाचे पाणी दिसत नाही.
वालुकामय प्रदेशातही झरा एखादा दिसेल,
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.

जाळयातला मासा तडफडत असतो,
कोळयाची धडपड तर निष्फळ, व्यर्थ.
पण मरता प्राणी मरता मरताही धडपडत असतो.
जाणारे जीवन मिळेलच मिळेल,
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.

त्याला मृत्यूची भीती नाही,
जगावेसे वाटत नाही,
कसलीही आशा नाही,
परंतु कुठेतरी खटकते आहे–पश्चात्ताप !
त्याग काहीच झाला नाही,
कर्तव्याला चुकला !
निराशेच्या ढगांआडून आशा किरण येईलच येईल,
म्हणून तर जगतो आहे,
जगून सारे बघतो आहे.



# २. काऽव काऽव . . . कुऽहू कुऽहू

खिडकीशेजारी झाडावर घरटे एक इवले
काळ्या कावळ्यांचे तेथे एक जोडपे राहिले.
दिवस गेले, महिने गेले आणि 'दिवस' गेले,
नियतीने नियोजन हेरले, दोन जीव जन्माला घातले.
उठले, पडले, रांगले, बसले असे ते डोळस झाले,
एक दिवस चोची उभवून, संसार सारा न्याहाळू लागले.

का कोण जाणे ! मी घरट्याकडे पाहिले–
सहज म्हणून, पण दिसू नये ते दिसले !
अरेरे ! रक्ताची नाती अशीच का फसावी ?
एकशेपाच्याची भाऊबंदकी आजही दिसावी ?
विचार झाला सुरु, सपण्यापूर्वीच काळ लोटला,
भुर्रकन् उडून गेला, त्यासवे वादही मिटला.

एक जीव एक दिवस उडून गेला,
आम्रवृक्षाच्या डहाळीवर भीत भीत बसला.
झाडाखालच्या मुलाने दगड उचलला,
तो जीव का ऽ व का ऽ व ओरडत सुटला.

प्रभातसमयी एक दिवस दुसराही उडाला,
त्याच आम्रवृक्षावर ऐटीत बसला.
मुलगा दगड उचलायचंच विसरला,
तो जीव कु ऽ हू कु ऽ हू गात राहिला.

# ३. 'लोकमान्य' बाळ गंगाधर

मर्त्य देहाचे किती जन्मले सजीव पुतळे, सजीव पुतळे,
पोलादाचे इथेच घडले, 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

शिखराचे तर बुध्दयांकाच्या गिर्यारोहक बहुत झाले,
शद्धांगार मूर्त कर्मयोगी ! 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

हिरण्यकश्यपु वधायाला जणू नृसिंह भूवर अवतरले,
ते नर – सिंह जाहले, 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

स्वातंत्र्यास्तव अनेक जगले, लढता लढता कितेक मेले,
'स्वातंत्र्य जन्मसिद्ध हक्क' बोलले, 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

सरळ पुढती नाकापुढती बरेच अपुला मार्ग चालले,
गिरिकंदरे तोडीत गेले, 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

स्वाभिमान स्वत्व राखायास्तव लढणारे तर लढले लढले,
दर्यातुफानी झुंजार योध्दे 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाले.

कलियुगाचे कलिपुरुष तर कलियुगाने महान केले,
'लोकमान्य' परी लोक म्हणाले, 'लोकमान्य' बाळ गंगाधर झाल.

अन्यायाचा दिसता जय अंतीं, बाळ गंगाधर टिळक वदले,
न्यायासनाचे जज्ज जगाचे फक्त एकले, फक्त एकले



# ४. सीमेवरच्या शूर वीरांनो!

भरतपूतांनो, मुक्तिदूतांनो ! मानी मुजरा गोमंतदेवीचा
मुक्त मनांच्या मुक्त रवीचा गोमंतकाच्या मुक्त प्रभेचा

रुद्राचे अवतार अहा ! शोभला खरोखरी रणमैदानी
मुक्त तनांच्या मुक्त मनांच्या तुम्ही उतरलांत मनमैदानी

तोडून नाती तोकडी रोकडी लक्ष निर्मिली देशप्रीतीची
ना 'ती' ! 'मां' ती ! नाती माती ! ! गाती कवने कवी कीर्तीची

ह्या मातीच्या कणाकणास्तव तनमनधनही तुम्ही ओपले
शिर प्राण जरी तळहातावर सैतानाला छान चोपले

आत्मश्रध्देची छाती निधडी ह्या देशाची शान रक्षील
शेवटचाही शिरीष इथला ध्वजा फडकती उंच लक्षील

मान ताठ जर तुमची, आमुची, भारतभूची सदैव राहील
चलता पुढती पुढेच तुम्ही देश मागुती चलता राहील

सीमेवरच्या शूरवीरांनो ! गोमन्तकाचा विनम्र मुजरा
अष्टांगांनीं करितो तुम्हा नव्या युगाच्या हरीहरा



# ५. भोगतो मी मुक्त कारावास

आभाळाचे पीस
उबवताना रातदिस
धरित्रीची कूस
होते माझ्या नियतीची मूस !

पिऊन टाकतो निःश्वास
आभाळ धरतीमधला श्वास
तेजोगोलाभोवतालचा प्रवास
भोगतो मीं मुक्त कारावास !

पुसून टाकतो ध्यास-
ध्येयवेडा! जीवनमृत्यूचाच आभास!
वरखाली अधांतरी हा भास, असाच आभास
वरखाली बघता बघताच उमटले नवी आस!

# ६. राजा-राणी

ऐका सांगतो सुरस कहाणी
अमर करा मम 'नूतन-वाणी'
'नूतन वाणी' नसे कहाणी
कहाणीत मम राजा-राणी

रविराजाला किती बायका ?
एक अधिक एक दोन बायका !
आवडती अन् नावडती ?
अं हं! दोन्ही त्याला आवडती

पहिली राणी उषाराणी
खडीसाखरे सम जणू वाणी
'सस्मित स्वागत' अमोल करणी
जगा जागवी चतुर शहाणी

दुसरी राणी संध्याराणी
गोड गुलाबी प्रेमशिपणी
'रडे नसावे' करी शिकवणी
'हसा हसा' हो अमृतवाणी

'सफळ संपूर्ण! प्रेमकहाणी
राण्या दोन्ही एकबाणी !

# ७. बा-बा

बा–बा बाळाचा
का–कावळ्याला
घननिळ्या सांवळ्याचा
ळळा कावळ्याला

'चीव' चिमणीला
काऽव काका वदला
चल चल चलू या
बाळासंगे खेळू या

चिऊताई चिवचिवली
लाजली थोडी बावरली
'इश्य! अय्या!!' पुटपुटली
सावकाश खाली उतरली

बाळाने ऐकले–काऽकाऽचीऽचीऽ
खुषींत म्हटले–काऽकाऽचीऽचीऽ
खेळायला काका चाची
मज्जा झाली बाळाची



# ८. भाऊ

सचेतन सुंदर राजधुरंधर
कधी पाहिला नव्हता पळताना, ढळताना
हाय ! तोच आज जळताना
बघवत नव्हता साश्रू नेत्रांना,
मिरामारच्या श्रांत लाटांना !

अनाथ बिचारी राखी हात तिचा तुटला होता
पुनवेचा चांद कारण पुनवेलाही येणार नव्हता!
पाऊस आज चिडीचूप! ढगांआड दडला होता
काळ, काम, वेग विसरून सूर्य पार ढळला होता
सुवर्ण किरणांचा तेजोगोल आज मावळला होता

बालसुलभ रंगतीचा
मर्दाच्या तडफेचा
हा खंदा टेस्टमन तीक्ष्ण धारदार नजरेचा
तुफान गोलंदाजी, धावांवर धावा
टाळ्यांचा पाऊस
मानकरी पहिला वहिला पहिल्या वहिल्या शतकाचा
अतिसावध हा झुंजार
तासन तास खेळला
नाबाद ? दैवदुर्विलास !
काळाच्या गुगलीला बळी पडला ! !

सह्याद्रीच्या बळाचा हा गोमंतकाचा सिंह
लोकराजा झाला, लोकशाहीला सामोरा गेला
राजाच्या रुबाबतला खानदानी
मानी मऱ्हाठेपण जगला

कुबेराला खिजवणारा, कर्णाल लाजवणारा
श्रीमंत श्रीमंती वाटत राहिला प्रसादासारखी
म्हणूनच देवही 'देव' पण विसरले
त्या दिवशी म्हाळसेचे दिवे गेले !

दयानंदाने दया केली
कलेकलेने कला वाढवली
नाटकाची सेवा केली
सेवेचे नाटक नाही केले

क्वचित् भडकला
वाघासारखा गुरगुरला
पण ग्रीष्मातही श्रावणशिखे
तनांमनांवर सतत बरसले
म्हणूनच जिमखाना खेळाडू ठसठसा रडले!

अरबीची किनार ह्याच्या विशाल मनाला
मांडवीचा संथपणा ह्याच्या काळजाच्या बोलाला
तांबडया मातीचा लालपणा ह्याच्या आरक्त देहाला
देवदैवतांची भक्ती ह्याच्या रोमरोमात
ह्याचे चारित्र्य शुद्ध! पर्वताच्या उंचीचे
अन् दुधसागराच्या शुभ्रतेचे!

गोव्याची नम्रता ह्याच्या हातांनी नमस्कारली
गोव्याची अस्मिता ह्याच्या स्मिताने बहरली
गोव्याची झोपडीन् झोपडी ह्याच्या महालात स्थिरावली
जनता भाऊंकडे गेली सत्ता मागून चालत आली
भरल्या पंक्तीला स्वत: भरबावे
असा हा थोर प्रपंची, परमार्थी
लोकमान्य, सर्वमान्य सर्वांमुखी झाला
एक दिवस भरल्या ताटावरुन मध्येच उठला
भाऊ, वंदन! अभिवादन!!

# १. शिवार पेटलेले

शिवार पेटलेले, मन तरी जळेना
काय आज झाले माझे मला कळेना

ज्ञानेश ज्ञानियांचा ज्ञानेश्वरीत रमला
विनयादरे विनोबा गीताईच झाला
बोललेही कुणी बोल कुरुक्षेत्र खोटे
नवलही नच गमे आज मना मोठे
गीता–मुख निशःब्द मूक ! जीभही वळेना
काय आज झाले, माझे मला कळेना

अवधा कलिंग देखे विधुर, अशोक राजा
शस्त्र म्यान करिता अहिंसेचियाच काजा
अध्यात्मपिंड माझा तयावरीच पोसे
आर्त विकल दीनांचे दुःख तरी मी सोसे
जीवघेणे क्रौर्य सभ्य !! हृदय हळहळेना
काय आज झाले माझे मला कळेना

'गुरुर्ब्रम्हा...' म्हणता कुणीहीं मान मम लवावी
'गुरूर्देवो..,' म्हणुनि त्याची पूजा मी करावी
परंपरा देशी घडली वेदपुराणकाली
वृद्धी बुद्धीची होता तत्क्षणी मने मरून गेली !
सुर–गुरु असुराधम झाला !! हृदय काजळेना
काय आज झाले माझे मला कळेना

# १०, तुझ्या माझ्या दुराव्याला

आकाशातला चंद्र नेहमीच दिसावा
नील आर्मस्ट्रॉंगही पूरेपूर कळावा
पण त्याचा 'तो!' चंद्र दृश्यातही अदृश्य व्हावा
प्रिये ! तुझा मुखचंद्रमा गोऽड स्वप्नातच विरावा!

तळयाकाठल्या माझ्या खडयाला
तुझ्या मनाचा तळ कळावा
चपळगती भंगुर बुडबुडा,
विहरावा, विरावा! अस्तित्व–स्मृती व्हावा
प्रिये ! स्मरत रहा, जगत रहा,
बुडबुडयासारखी जागत रहा
विरह-मुक्तिमार्ग गुणगुण !
ओठांच्या मायक्रोफोनमधून गात रहा

काळजी नको-रेकॉर्डींग होतंय
वेडे ! अंतरीची टेप कधी संपत नाही !
प्रीतीच्या माईकचा 'मूड ऑफ' कधी होतच नाही!
गा ! गात रहा ;
पण दुरूनच !
कारण, तुला मला
इंपोर्टेड प्रीतीच्या हरेक जकातचोराला
चौदा कॅरेट तरी ठाऊक आहैच
प्रीतीच्या जगात 'न्याय' नाही, 'नीती' नाही
न्यायनीतीचा शब्द नाही
असलाच तर अर्थ, नाही अर्थापोटी स्वार्थ नाही
तू तशीच दूर रहा

कारण, तुझ्या माझ्या दुराव्याला वेगवती मनाची लिफ्ट आहे
कल्पनेची फ्यूज न जाणारी लाईट आहे
नेत्रांच्या प्रतिक्षेला क्षितिज–पापण्यांची किनार आहे
मस्त पोहायला आकाशरंगी बुबुळांचा डोह आहे

नीलला दिसलेल्या चंद्रातच तू मला दिसते आहेस
नील-नेत्रांना पापण्यांची पाखर घालीत आतुर !
हनीमून रंगवते आहेस !

तू म्हणाली होतीस म्हणून काही तरी लिहिले आहे
मेंटल इस्पितळाची भाषा मेंटलवाल्यांनाच उमगली आहे !

# ११. मी-तो

कोणीतरी म्हणाले–
'आत्मपरीक्षण करा.'
आत्मपरीक्षण ! आत्मपरीक्षा! आत्मसमीक्षा! केली,
स्वत:च घ्यायची स्वत:ची परीक्षा 'न्यू मेथड' आवडली
पण मी, परीक्षा घेणारा माझी–
माझाच परीक्षक राहिलो,
परीक्षा देणारा तो, माझा
सर्वांचाच परीक्षक झाला !

कोणीतरी म्हणाले–
'आत्मशोधन करा.'
शोधन, संशोधन
तेव्हापासून करतोय बोधन!
मात्र मला शोधणारा 'मी'
माझ्यातूनच फिरतो आहे,
दुसऱ्यांना शोधणारा तो-
इंपोर्टेड गाडीतून फिरतो आहे!

कोणीतरी म्हणाले–
'चहा नको, पेज प्या निवळ.'
'शरीरमाद्यं....' काहीसे महाजन म्हणालेयत
म्हणून पेय पेज, कवळही 'निवळ'
पण पेज पिणारा मी–
जिरल्या पोटाचे 'पोते' करकचतोय!
रम पिणारा माझा मित्र–
भरल्या पोत्यांची पोटे न्याहाळतोय्!

कोणी तरी म्हणाले–
' आत्मसंयमन–नियोजन! '

केले ! तेही केले !
परिणाम ? दोन आणि तीन पाच झाले,
माझा मित्र वस्ताद !
उदयोगी ! ! त्याचे वाढले, शंभर झाले! !
असा मी! असा तो ! एकाच जगातले दोन बाप्पे !
खंत एवढीच, मी-तो- हरेक येथे एकाच मोलें मापे!

# १२, फायनलला सायंकाळी

फायनलला सायंकाळी तू एकाकी
आतुर ! मैदानात उतरलीस
आणि मला नक्की आठवते–
मी लाजलज्जेच्या फुटबॉलला सरळ ठोकरुन
ओठांना गूज बोलत म्हणालो–फक्त एकच–फायनल !

तू लाजलीस-‘ चला! बावट !’ जपून बोललीस
मी बेफिकीर ! ‘छोड दो यार!
फायनलला तर उशीर आहे
तोपर्यंत तू, लाल गुलाबी सायंकाळ
आणखी एकच फायनल! ’ निरोपांच बोललो.

.... पण फायनल ड्रॉ झाली
सायंकाळ शेवटाला आली
आणि मला नक्की आठवते
त्या दंगलीत तू ... तू ..., ! पण नकोच !

..... मात्र त्यावेळी प्रेतावर अश्रू-फुले वाहताना
अनावर मला
आज समाधीवर फुलांचे अश्रू वाहताना
खूप बरे वाटते.

कारण, त्या फायनलला ‘ ड्रॉ ’ होता
हजारोंचा स्टेडियम पुन्हा फुलणार होता
गोलवर गोल चढून पंचमीचा रंग उधळणार होता
– मी नसलो तरीही

आणि त्या सायंकाळच्या सावल्यांचा शेवट लांबला तरी
त्या शेवटाला जोडून चांदरात होती
चांदण्याची ती धवलगंधा
चंद्राच्या मिठीत हरवणार होती
आम्ही नसलो तरीही

पण तुझ्या एकाकीपणामागे मात्र
फायनलच्या सायंकाळची राक्षसी पडछाया होती
हजार कावळच्यांया हजार डोळ्यांची
किळसवाणी नजर होती
मी असलो तरीही !
आम्ही असलो तरीही !!

# १३. दिल्लीमधली गुलाब-थंडी

दिल्लीमधल्या स्थळास्थळाची परीट घडी अपटुडेट
की बघत राहणारा विसरुन जातो परतायची डेट

दिल्लीमधली खूबसूरत पोरगी खूलती उमलती काश्मिरकळी
की साठसहस्त्रवाला विश्वामित्रही क्लीन बोल्ड! स्वयंबळी!

दिल्लीमधली गुलाब-थंडी अशी काही रोमँटिक
की काटचात काटा हरवून जाता नकळत बंद टिक् टिक्

दिल्लीमधली जनता-गर्दी अशी अफाट! तरीही सपाट
की लाखामध्येंही एकेकाचा बघून घ्यावा थाट

दिल्लीमधले फरशी–रस्ते धुऊन पुसून साफ साफ
की चुकल्या बाऱ्यांनी मोजून घ्यावे सुरकुतीचेही माप

दिल्लीमधला चांदणी चौक असा काही मायावी
की भिक्षा विसरुन मृगाची मागणी रावणानेही करावी

दिल्लीमधले किल्ले, मिनार असे ऊंच टोलेजंग
की हवाई परींशी शेकहँड करीत व्हावे मस्तीत दंग

दिल्लीमधल्या ट्रफिक पोलिसाचा पार्लमेंटपाशी लाजवाब डौल
की 'च्यायला!' असेल काय नशिबी आणखी एखादा चान्स?

## १४. कविते मला क्षमा कर !

कविते, मला क्षमा कर !
प्रसववेदना शमतील माझ्या
एकदा तरी स्मर

चिल्लर कवीचे नांव सांगायची–
लाज तुला नको
म्हणून, गर्भातच मारायला तुला–
प्रसाद, गुली, घाडी मी केले
शस्त्रक्रियेनेच उत्तरक्रिया उरकावी,
नीतीची चिरफाड नको
म्हणून ऑपरेशनासह संपूर्ण
विज्ञान मी पणाला लावले

पण नाही !
तुला मारता स्वत्व मेले
सत्व उदेले
चिळकांडी मारून परतत्त्व संवेदले,
तेच लिहिले

कविते, माझ्या छंदांमुळे तुझे छंद खुंटले!
माधुकरीचा मधुकर मी, तुला अलंकार कुठले?

कविते, माझ्या दारिद्र्याच्या वास्तववादाचा
तू नागडा उघडा स्वच्छंद
जीवनसुलभ धुंद मस्तीचा आविष्कार
केवळ मुक्तछंद ! केवळ मुक्तछंद !

# १५· चिऱ्यावरला एक गुलाब

कोणी एक म्हातारी मरतुकडी
म्हणे कोसळली कधी तरी याच गटाराच्या बाजूला
आणि मग माणसाची किंमत दगडांनी मोजणाऱ्या जगाला
तिची कहाणी सांगत राहिला एक ' दगडी ' दगड !

मी हे ऐकून अवाक् होतो
अवतीभवती चोरनजरेनं बघत नकळत
भग्न चिऱ्यावरच एक गुलाब ठेवतो.

ह्या नव्याण्णवाव्या दगडापाशीच ती अडखळली होती
नव्याण्णव ऊनपावसाळे चक्क दळणारी
तिची जीवनचक्की इथेच थांबली होती

होय! ऊनपावसाळे तिने दळलेच होते
अविश्रांत परिश्रम शळेलाही कळले होते
म्हणूनच ओसाडलेल्या उदयानातील
एकच सुकले फूलही तुटले नव्हते,
झडले नव्हते,
शेवटले दर्शन शाळेचेच घेणाऱ्या शांत मनाच्या
श्रांत देहाला जीव बिलगून विसावले होते

थेट समोर आज तेथे उभारलाय् एक ईश्वर
नावही त्याचे छान ठेवलेय् राखणेश्वर
तेथे पै–पैसा टनामगांनी स्कीमविना पांढरा होतो
माझ्यासारखा भक्त नकळत भग्न चिऱ्यावरच गुलाब ठेवतो

माझ्या मुर्खपणाला हसणाऱ्या देवांच्या भक्तांनो
एक फूल इथेही वहा
तपाचे जीवन जपाने स्मरा
देवाची चाहूल लागेल
एक पाऊल इथे थांबा

पण माझे सांगणे मुर्खपणाचे!
काही झाले तरी
तुमचा नैवेदय ईश्वरावरचा चढतो
माझ्यासारखा भक्त नकळत
भग्न चिऱ्यावरचाच गुलाब होतो'!

# १६. मी एक जिवंत प्रेत

चला उठा बांधा तिरडी
रडणारांची घोटा नरडी
नजर एकवार करुन करडी
चला उठा बांधा तिरडी
मी एक जिवंत प्रेत !

जिवंत हेत जिवंतपणी
जेथे तेथे पेरुन देत
वळणांच्या मिशीकंसांना
सरळरुप देत घेत
प्राक्तनाच्या वळचणीत
अतृप्त आत्मे हेरत तेथ
मी एक जिवंत प्रेत !

बॉक्स नको, तिरडी खरी
उघड दशा उघडीच बरी
बघताही येईल कोणकोण रडतं !
अभिनयातलं कुणाकुणाला जमतं !!

..अरे, ते तर जमलेल्यांतल्या सगळयांनाच जमतं
चक्रावणाऱ्या शिवीचंही पुष्पचक्र होतं
वाढती कुजबूज मन ऐकतं
पेटून ते ओरडू बघतं

लख्कन् अवचित लाकूड पेटतं
माझंच मला संपूर्ण भावतं
बुडत्या सूर्याच्या रक्त लालिम्यात
मी एक जिवंत प्रेत !

# १७. प्रश्न

हालत्या गाडीत अनोख्या आवाजातनं
कधीतरी एक प्रश्न आला–' जेवण हवंय काहो ?'
मी सरळ भुंकलो–दुपार झाली ?'–
रॅबीज झालेल्या कुत्र्यासारखा.

विचारणारा निघून गेला !
पण जाताना प्रश्न ठेवून गेला! !

तो आता जाणार नाही
व्हॉल्टही काही घेणार नाही
कारण, तो तर आता तट्ट फुगलाय
विरामचिन्हांचं रक्त पिऊन
प्रश्नाचा गोचीड खोलवर रूजलाय
काविळीच्या प्रदेहाला फिक्कट पिवळा रंग भरलाय
विरामचिन्हांचं रक्त पिऊन
प्रश्नाचा गोचीड खोलवर रुजलाय

आत्ता कळलं–प्रश्न ' ती 'चा होता
तिनंच वख्त हेरून विचारलं होतं–
जेवण हवंय का हो ?
मी सरळ भुंकलो होतो–
रॅबीज झालेल्या कुत्र्यासारखा
' दुपार झाली ?'

पण ' दुपार टळली !'
म्हणायलाही ती नव्हती
फक्त प्रश्न होता प्रश्न !
तोही माझा ! !

# १८. चांदण्यांचे झाड

खळखळून हसल्या हसल्या, चंद्रावरती रूसल्या
किती तारका तुटल्या फुटल्या किती तरी फसल्या
माती माती जाहल्या अन् मातीतच त्या रुजल्या
अग्निदिव्यही पार पाडुनी झाड झाड जाहल्या

की रजनीसंगे चंद्राने ग केले भलते लाड
बाई, केले भलते लाड
धरतीवरती पहा उदेले चांदण्यांचे झाड
बाई, चांदण्यांचे झाड

चांदण्यांचे झाड त्याला पाचूचीच पाने
दीपावलीचा सडा रुपेरी चेतून गेलीं राने
आभाळाच्या मांडावरती फुगडी धालो रंगले
चांदण्यांचा महाल उघडा, विडे चुन्याविण रंगले

अंबरात तर चंद्रासाठीं अनुप मायाजाळ
बाई, अनुप मायाजाळ

अमुच्यासाठी प्रतिबिंबित ही काजव्यांची माळ
बाई, काजव्यांची माळ

# १९. पाऊस

जा रे जा रे पावसा,
हवा तुला जर पैसा
पैसा झाला फुटका
पाऊस रुसला लटका

जा रे बाबा कृपया
हवा तुला जर रूपया
रुपया गेला फाटून
पाऊस आला दाटून

पाऊस कोसळला मुसळधार
देवही झोपला लावून दार !
शेतीभाती वाहली पार
बिज्ञान बिचारे ठार गार !!

संयम सुटला, निर्लज्ज झाला
पिसाट मोकाट वाराही लाजला
वेडा पाऊस वाट हरला
कंठ दाटून रडत उरला!

# २०. देव कधी भेटलाच तर–

देव कधी भेटलाच तर –
डोहात बुडवल्या गाथेसाठी विनवणी त्याला करणार नाही
' नैवेद्य, माझा खात का नाहीस ? ' रुसून फुगून बसणार नाही
शुद्धीपत्राची गोष्ट तर चुकूनही काढणार नाही

'माग! ' म्हणताच एवढेच मागेन–
'कोणे एके काळी येथे गाथेतून तुकोबा तरला,
नामरुप अभिन्न देव नाम्याचा नैवेद्य जेवला,
रेड्यामुखी वेद वदवून ज्ञानेशाने मोगरा फुलवला,
असे काही थोडेफार माझ्या पिढीला कळू दे !

पुरे झाली चंद्रगाथा !
पुरता उमगलाय मंगळही आता ! !
अरे, ते तर निव्वळ भूगोल आहेत।
माझ्या भूगोलाला इतिहासही आहे !
असे काही थोडेफार माझ्या पिढीला कळू दे !

निदान एवढे तरी कळू देच–
तुकोबा–ज्ञानियांच्या या भारतभूला
रामदासाने मती दिली होती
बुध्द–अशोकाच्या त्याच धर्मचक्राला राम–कृष्णाने गती दिली होतीं
आणि हसत फाशी जातानाहीं
वासुदेव बळवंताहाती मातीं होतीं !

# २१. शुभास्ते पंथानः सन्तु!

तथाकथित बुद्धिवादयांची कीव करीत रणझुंजार जेव्हा गरजतो,
"बुद्धिवान माणसा, तुला झालं आहे तरी काय ?"
तेव्हा फडतूस भगव्या कफन्यांची लक्तरे वेशीवेशीवर टांगली जातात
आणि 'पतिविना अपत्यप्राप्तीची 'जादू' करणाऱ्या–
बाबांची, आचार्यांची कलेवरे रस्तोरस्तो उघडी पडतात
कोल्हे कुत्रीही विचारीत नाहीत !

फुले, आगरकर, आंबेडकरांच्या परंपरेतला हा शिलेदार
बेधडक गोव्याच्या व्यासपीठावर उभा ठाकतो
आणि अमोघ अमृतवाणीचा स्त्रोत अविरत बरसतो
तेव्हा दूधसागरालाही त्याचा हेवा वाटतो.

अर्धे जग फिरलेला हा माणूस
रसिल्या नजरेने तिथली क्षणचित्रे टिपतो
टिपता टिपताच बांगलांच्या दु:खितांची टिपे
आमच्या डोळ्यात उभी करतो.
समृद्ध मराठी परंपरेचा 'असा हा महाराष्ट्र'
गोव्याच्या मातीत 'असा हा गोमन्तक' जिव्हाळ्याने फुलवतो

याच्या अग्रलेखांचा गडगडाट जणू नृसिंहाच्या खांबाचा कडकडाट
कानांकानांत घुमतो. काळजाकाळजाला हात घालतो

पण, साहित्यमंदिराच्या पायरीवर चढता चढताच
तुमच्या आमच्या हातांची गुंफण सुटली
.... आता मंदिरात काही बघणे नको
देवडीवरुन थोडे काही ऐकता येईल तेवढे पुरे
पण त्या साहित्य दिंडीत तुमची तान हवीच हवी !
शान राखण्यासाठी एकमेकांची मानहीं ताठ हवींच हवी !

# २२. श्रुतलेखन

काळाच्या पाटीवरल्या श्रुतलेखनातल्या
लाल शाईने अधोरेखित वेलांटचा, उकार
जेव्हा कानामात्रांना फिदीफिदी हसतात
ऋषीचे कूळ नी नदीचे मूळ
पाहू नये म्हणणाऱ्या समस्त पूर्वजांवर
फुले वहातच स्वकुल–कथा रंगवून सांगतात
तेव्हा कानामात्राही बधिर होतात
तिर्थक्षेत्रांवरल्या महारोग्यांची हजेरी वाढवतात

,...आता ते रोगी नाहीत
तरीही ईकार, ऊकारांचे रोग आहेत
केल्या चूकांची जुनेरं धुत
भूत वर्तमानाचे भविष्य बघताहेत

बाकी त्यांना ठाऊक नसेलच काय ?
की तापल्या सळईवरल्या मेणाच्या गोळयांत
आपलाही नंबर आता लागणार आहे !
भवितव्यतेची पिसाट लाट
वाळूवरल्या रेघा पुसणार आहे !!

# २३ सायकल

कर्र्र कूं ऽऽ कूं कर्र्र कूं ऽऽ
ऑईल नाही काय ?
रिपेरिंगला आलीय वाटतं !
की रस्ताभर आपलं आहेच रुदनगीत ?
... सायकलचं माझ्या एक बरं आहे–
कर्र्र कूं ऽऽ कूं कर्र्र कूं ऽऽ

टार रोड तर संपला
बरं झालं ! सूर तालबद्ध झाला
खाचाखळग्यांचे गीत नाही तरी कोण गाणार?
ओझ्याच्या गाढवाला हवाई बस कोण देणार?

....आली ! आता शाळाही आली
शून्य अधिक शून्य बरोबर शून्य
शून्य उणे शून्य बरोबर शून्य
पोरांची पट्टी लागली
आणि नित्याचीच पिपळ–फांदी
कर्कश करकरली
कर्र्र कूं ऽऽ कूं ऽऽ कर्र्र कूं ऽऽ

# २४ प्रिये.

आषाढघनांचा तव गच्चसा अंबाडा
प्रिये ! श्रावणसरींनी ओला प्रेमिकांचा वाडा
मोहक मुखडा पीत तांबूस वर्णाचा
वाहे हव्यास नित्याचा धुंद मीलनाचा

सृष्टीच्या शालूला गर्द क्षितिज किनार
सोनियाची ल्याली अंगी चोळी नक्षीदार
विदयुत मिलनी मग वृक्ष हरवतो
कण कण पतंग मी क्षणक्षण होतो !

# २५. क्रॉस

लॉ बुकातलं फाड् फाड् इंग्लीश
शत्रुपक्षावर धाड् धाड् फेकीत
शहराच्या मध्यवस्तीत इमले उभारणारा
माझा ॲडव्होकेट मित्र मला वेडा म्हणतो.
होय! धुलिवंदनाच्या शिमगा गर्दीत येशूच्या पाऊल खुणांशी
मी रामराज्याच्या पाऊल खुणांची मेजरमेंट जुळवतोय !

क्रॉस ! बोल ना रे !
माझ्या टी. बी. झालेल्या
बॉसच्या रक्ताची शपथ तुला
बोल ना रे ! !
षंढ, दुरात्म्यांनी खिळे ठोकले,
त्याक्षणीही तू मूकच होतास ना रे ?

रामराज्यात सारं कसं ठाकठीक होतं–म्हणतात !
एकबाणी राम, साध्वी सीता
रामसीतेच्या काळजाचा हनुमान
कण-कण रेतीत सेतूचं स्वप्न बघणारी खार
दगडधोंड्यांची अस्त्रधारी वानरसेना वगैरे वगैरे
पण म्हणे कूजबूज करणाराही
कोण एक दीडशहाणा (!) होताच
क्रॉस! मी तुझी जीभ शोधतोय !

रामाच्या पदस्पर्शानं
सती अहिल्या पावन झाली .... असं ऐकतोय !
हा देश मुळांतच दगडांचा होता का ?
मी कलंकीची वाट बघतोय!

क्रॉस ! तू पक्का इँबीस आहेस
भरल्या जखमांचे डोके
अश्वत्थाम्याला देऊन तू स्वस्थ झालायस.
अरे, तुझ्या सुडाच्या डोळ्यांनी
न्यायदेवतेच्या डोळ्यांवरची पट्टीही आज जळून गेलीय
म्हणून इस्त्रीच्या पांढऱ्याफेक चेहऱ्यानं
तू हसतोय्स.
'दर्ददु:खित देहांच्या जखमांचे रक्तपाट
तुझ्या देहातून वाहले आहेत'
म्हणणारे खुशाल म्हणोत,
तुझा इतिहासच लाल आहे !

शुभ्र झगा मिरवणाऱ्या शांतिदूता !
माझ्या बॉसच्या रक्ताची
ओकारी बघून तुला शिसारी नाही आली ?
–तर तुझे स्वागत असो !

रेडक्रॉस ! तुला साष्टाग प्रणिपात-
मी मूर्खासारखा बडबडलो.
माझा क्रॉस माझ्या खाटेवर,
माझ्या छातीशी आहे,
रक्ताच्या थुंकीनं पचकन् थुंकून लाल झालाय्
तरीही त्याचा 'कीस' सुटत नाही !
पांढरा रंग शांतीचाच द्योतक ना ?
मी आज शांत आहे! शांत आहे !!

# २६. वनमहोत्सव

मूर्ख !
झाडापेडांच्या कापाकापीचं काय घेऊन बसलीस ?
तूच तर म्हणाली होतीस !
'पुरे झाला बाई, ताप.
घरात आता 'चिल्ड' काहीतरीं हवंच !'
–मग रिफ्रेजिरेटरला लाईट नको ?
'मंडळात कधीतरी मंत्र्यांना आणायलाच हवं बाई ?
–मग अॅबासिडर. ओपेलला, मारुतीला रस्ता नको?
येडपटच आहेस !

अग, झाडापेडांच्या कापाकापींचं काय घेऊन बसलीस?
एवीतेवी वनमहोत्सव साजरा करायचाच आहे !
लावून टाकू या ना गडे,
एक छानसं रोपटं !

पूस !
अग, पूसून टाक आता तुझे ते
बागपत, प्रिप्राच्या महिलांच्या विटंघनेचे अश्रु,
पडद्याआडून नीट बघ ...
द्रौपदी वस्त्रहरणाचे मस्त महाभारत चालू आहे,
पांडयांच्या भीमकाय पराक्रमाला जरा वंदन कर !

नाही तरी हल्ली
तुझं डोक फिरलंय,
कोण कुठली चोप्रा भावंडे ?
जोशी–अभ्यंकर हत्याकांड,
मानवत खून सत्र.

'हुतात्मा–दिन' ला अजून अवकाश आहे,
रंगा–बिल्लाच्या नांवानं तोपर्यंत
श्रद्धांजलीचं एक भाषण लिहून काढ ना !
हल्ली दंगलीनीही तुझं डोकं पेटलंय

म्हणे जामा मसजिद, बाल्लीमारन दंगल
इस्ट बंगाल–मोहन बागानवाल्यात चकमक
अहमदाबादेत जाळपोळ, लुटालूट
मोरादाबाद दंगल-शेकडो बळी
या देशाचं काय होणार,
हाच प्रॉब्लेम ना ?
सोल्युशन सोप्पं आहे !
राष्ट्रीय एकात्मता दिन,
राष्ट्रीय एकात्मता वीक,
राष्ट्रीय एकात्मता मास वगैरे वगैरे.
आसामवाल्यांनाही वाटल्यास सांगून टाक !
तुझं-माझं सावकाशीनं बघता येईल.

झुल्फिकार अली भुत्तो, ओवेदा फासावर,
झिया ऊर रेहमानची हत्या
चकमकीत मेजर मंजुर ठार,
रिपब्लिकन पक्षाच्या कार्यालयात बाँबस्फोट !
केनेडी नी मार्टिन ल्यूथर किंगलाही
जेथे महात्माजींचीच गोळी
तेथे अन्वर सादत किस काडतूस की गोली ?

अग, सगळेच अपोलो-११ होत नसतात
काही स्कायलॅबही निघतात !
तेव्हा हिंदमहासागर असेपर्यंत
तुला काळजी कशाची ?

आता तर तू साधुपूर–देवळीच्या पदयात्रेचं
तुणतुणं लावलंयस !
अग, बागपत–भागलपूर हा प्रारंभ नव्हे
की साधुपूर–देवळी हा अंतही नव्हे
बळीच्या बकऱ्यांची ही यात्रा
आता नित्यनैमित्तिक, प्रतिवर्षाचीच !
तेव्हा राहवलं नाहीच तर एक मंत्र म्हण.
' प्रबोधन ' किंवा 'जागरण' म्हणायला सोपा पडेल तो ! -
आणि अगदीच असह्य झालंच तर
एक जोषपूर्ण नारा लगाव–
'समाजवाद लाना है ।' किंवा ' हम सब एक हैं '।
सोयीचा पडेल तो.

अग, झाडापेडांच्या कापाकापीचं काय घेऊन बसलीस ?
एवीतेवी वनमहोत्सव साजरा करायचाच आहे !
लावून टाकू या ना गडे,
एक छानसं रोपटं !

# २७. कोण कोणाचा?

कोण कोणाचा ? अहो, कोण कोणाचा ?
कोण कोणाचा ? अहो, कोण कोणाचा ?

मामा नाही भाच्याचा
कामापुरता मामा त्याचा
भाचाही मग कसा मामाचा ?
जो तो आपल्या कामाचा !

घाम नाही कामाचा
दाम नाही घामाचा
संबंधच काय घामदामाचा ?
जो तो आपल्या कामाचा !

साम नाही दामाचा
दाम नाही सामाचा
आवच नकली सामदामाचा
जो तो आपल्या कामाचा !

राम नाही श्यामाचा
श्याम नाही रामाचा
पिक्चरपुरताच जोडा रामश्यामाचा
जो तो आपल्या कामाचा !

नाम्या नाही रामाचा
राम नाही नाम्याचा
घोष नैवेद्यापुरताच रामनामाचा
जो तो आपल्या कामाचा !
कोण कोणाचा ? अहो, कोण कोणाचा ?
कोण कोणाचा ? अहो, कोण कोणाचा?

# २८. वाटा

ह्या इथे अशाच
होत्या काही वाटा...
काटयांच्या वाटा, गोटयांच्या वाटा,
चढत्या–उतरत्या वांकुडया वाटा,
तेल्यातांबोळयांच्या तांबुडया वाटा,

.., कधी कोण जाणे
मृगजळाच्या उठल्या लाटा !
की फुटल्या वाटांना तशाच वाटा ?
आलाही असेल कोणी वाटेचा महाकाय,
पायवाटांना मग फुटले असतील पायच पाय !

असो ! आता नाही काटा
नाही आता गोटा
' खाल्ल्या तेवढया पुरेत ' म्हणाल्या, खस्ता '
त्यानी धरला आपला रस्ता !

पण नशिबी नसावेच पायधूळ मस्तकी मिरवण्याचे
त्या वाटांचेच झाले रस्ते
पाऊलखुणांना डांबर फासून
ते झाले तोंड काळे करुन चालते !

बाकी खंत कशाला ?
वाटांचे अपराध, नाही तरी त्यानीच पोटात घातले,
विस्मृतीतल्या वाटांसाठी,
तेच मैलांचे दगड झाले !

# २९. चमचे हवेत का, चमचे ?

चमचे हवेत का, चमचे ?
स्ठीलचे, पितळीचे, ॲल्युमिनियमचे चमचे
कास्याचे, रुप्याचे, सोन्याचे चमचे
चमचें हवेत का चमचे ?

स्टीलचे स्टेनलेस, पितळीचे पिवळे धमक
ॲल्युमिनियमचे हलकेफुलके वापरायला बरे
कास्याचे आरोग्यदायक, रुप्याचे रुपेरी
सोन्याचे-ॲ हॅ ! सोन्याचेच ते !!
चमचे हवेत का, चमचे ?

वाटल्यास लोखंडाचे न गंजणारे
पोलादाचे पोलादी हिंमती किंमती !
कितीही किमतीला
आडवे, उभे कुठेही कसेही दिमतीला
चमचे हवेत का, चमचे ?

हो ! तशी घासागिशीला आपली हरकत नाही
हा आपला धंदा ! आग्रह नाही.
घ्यायला काय आणि प्यायला काय ?
धंदाच चमच्यांचा ! आपल्याला लाज नाही !
चमचे हवेत का, चमचे ?

...., झालं काय ?
स्वर्गलोकात गेलो, देवेंद्र भेटले
' नारदाला भेट जा! ' म्हणाले
मुनिवर्याच्या शोधात मृत्युलोकात....
.... भेटले ! आमच्या भेटीने तेही धन्य झाले
' नारायण ! भारत देशात चला ! नारायण! '
गुरुपदेश करते झाले.
पण खरं सांगतो !
चमच्यांशपथ सांगतो !
आम्ही साफ फसलो, सपशेल चुकलो !
भारत देशातच चमचे विकायला निघालो !!

# ३०. ब्राव्हो सुनील

सुनील तू, सु–अनिल तू,
शतकवीर तू झंझावात
शतक–राजा, विक्रम तूचि
विक्रमवीरा घे प्रणिपात,

लीटल मास्टर तूचि सनी, दशसहस्त्रांचा एक धनी
अजिक्य तू अद्वितीय तू स्थिरस्थावर मनोमनी

रणधीर तू नरवीर तू, तूचि सिकंदर जगत्‌जेता
नील नभीचा भास्कर तूचि सार्थ शोभला क्रिकेटनेता

सन्मानाने जगी बहुमान सार्थ आम्हाला तव अभिमान
युगाब्द करील तव नीत नीत गान!
ब्राव्हो सुनील अजित रहो !

## ३१. गाडीच्या प्रवासाचं

गाडीच्या प्रवासाचं असंच असतं
स्टेशन आलं की उतरावंच लागतं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं !

असेल भली एक्स्प्रेस
तिलाही शेवटल्या स्टेशनाची वेस
डायरेक्ट .... डायरेक्ट....
लोंबकळणारे निर्घेयंपत डायरेक्ट
मग तीही इन-डायरेक्ट
कुणी खेकसले की फिरुन डायरेक्ट
लोकलकडूनच चढत्या उतरत्य। भाजणीचा
पाठ गिरवावा
स्टॉप... स्टँड...स्टॉप...टँस्ड
स्टॉप--स्टेशन !
नाखुशीनं शाळेत जाणाऱ्या पोराच्या अनिच्छेनं
हे करावंच लागतं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं.
स्टेशन आलं की उतरावंच लागतं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं !

तसे भेटणारे भेटता।त,
बोलणारे ेलतात,
गोरेमोरेही होतात.
तसे काळे-गोरे आपलेच असतात
गप्पांच्या नादात मग कोणी गाडीही सोडतात
लटक्या डुलकीच्या सवयीनं स्टेशनही मागं टाकतात

कोणी काली
तशात लाली अधरी जाम रंगवतात
ऋतूंची खेळी, रंगांची होळी
ठायी ठायी खेळू बघतात
पण होळीलाही अंती
सीतामाईच्याच पावलांनी जावं लागतं.
इतिहासाचं भान ठेवलं तरच
सीमारेषेचं गणित सुटत जातं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं
स्टेशन आलं की उतरावंच लागतं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं !

तसं सुरु होणं सुरु झालं की
शेवटाला येणंही शेवटी येतंच !
यमनाचा सूर लागला की
भैरवीचा ऊर भरुन येणंही
कालातालाला धरुनच होतं !
शारदास्तवनाच्या ' श्री गणेशाचं ध्रुपद
अधरीं असतं
तेव्हाच उदरी पसायदानाचं गीतही–
आकाराला येत असत.
बोंडाची मान घडाच्या धडापासून
कापून काढावी असं हे दुःख
मायलेकीच्या विरहवेदनेनं
नी गर्भवतीच्या बेगानी सोसावं लागतं,
गाडीच्या प्रवासचं असंच असतं
स्टेशन आलं की उतरावंच लागतं
गाडीच्या प्रवासाचं असंच असतं !

# ३२. मानुषरुपे देव भूवरी

अनाचाराने मूठमाती जधी धर्म न्यायनीतीला
धर्मसंकट उभे ठाकुनि वाव अनीतीला
शांती ढळली एकरुपला मनुज प्रार्थनेला
मानुषरुपे देव भूवरी ख्रिस्त नामें जन्मला

दारिद्र्याची पार्श्वभूमी परी हसत जन्मा आला
श्रीकृष्णरुपी प्रकाश फाकुनी मुक्ती देऊनि गेला
अपमानाचे घाव साहुनि मानी जीवन जगला
मानुषरुपे देव भूवरी ख्रिस्त नामें जन्मला

समाजप्रिय तो प्रेमपुजारी शेजाऱ्यां पावला
समाज–उत्थान ब्रीद मानुनि शिष्यां उपदेशला
साहित्य–संगीत कला–उपासक शांती वाटत गेला
मानुषरुपे देव भूवरी ख्रिस्त नामें जन्मला

आकाशींचा बाप येशू तो आकाश भरुनी उरला
शब्दातीत रूपगुणसंपदा जगती अमर हो झाला
काव्य-अंजली हृ-द्प्रेमाची महामानवाला
मानुषरूपे देव भूवरी ख्रिस्त नामें जन्मला

# ३३. ख्रिस्त जन्मा आला

काळोखराती प्रकाश फाकला तिमिर दूर सरला
बेथलहेमला मेरीपोटी ख्रिस्त जन्मा आला ।।
गोठ्यामध्ये गोकुळ भरले देव भेटीं आले
योसेफ-मेरी नाझारेथही धन्य धन्य धाले
चला चॅपेली इगर्जीमध्ये दीपवाती लावा
घण घण घण धण घंटानादे आनंद जगतीं दावा ।।

आकाशतारा भूचा प्यारा 'जय येशुआ' नारा
तृषार्ता गारा भुकेल्या चारा दारिद्रया नच थारा
दिलदार हृदय प्रेमागर तो, मंत्र शांती त्याचा
दिव्यदर्शनी शुध्दोदन जणू प्रभूपूत साचा
चला चॅपेली इगर्जीमध्ये दीपवाती लावा
धण घण घण घण घंटानादें आनंद जगतीं दावा ।।

' राज्य स्वर्गीचे' थोर आकांक्षा ईश पिता त्याचा
सेवाभावाचा आचार्य आला खुशीत सारे नाचा
चला चॅपेली इगर्जीमध्ये दीपवाती दावा
घण घण घण घण घंटानादें आनंद जगती लावा
काळोखराती प्रकाश फाकला तिमिर दूर सरला
बेथलेहेमला मेरीपोटी ख्रिस्त जन्मा आला ।।

# ३४. मूकनायक

'पूर्वजन्मीची फळे! 'म्हणुनी श्वानापरी जे जीवन जगले
थुंकी झेलीत, लाथा सोशीत पायांचे' नीत दास राहिले
त्या दलितांना, त्या पीडितांना त्याने गदागदा हालविले
नव्या युगाच्या नव्या मनूचे दर्शन सर्वा दावियले
'ज्ञानबा तुकाराम' बोला त्याचा, कंठरवाने करा जयजयकार
बाबासाहेब आंबेडकर जय, जय मूकनायक आंबेडकर.

धैर्याचा हा मेरुमणी, विद्वज्जनांचा शिरोमणी
भक्तीप्रितीची खोदिली लेणी, वक्तृत्वाच्या अथांग खणी
वाक्प्रहारांनी गारद रणीं अज्ञानशत्रू केले
नव्या युगाचे नव्या मनुचे दर्शन सर्वां दावियले
'ज्ञानबा तुकाराम' बोला त्याचा...

एकलव्याची त्याची श्रद्धा. गुरुंवरही भक्ती सदा
झुंज द्यावया मागे न कदा, वर्णव्यवस्थेवरही गदा
घाबरगुंडी उडाली तदा, प्रबुद्ध भारत' बोलले
नव्या युगाचे नव्या मनुचे दर्शन सर्वा दावियले
'ज्ञानबा तुकाराम' बोला त्याचा...

कर्णापरी ते उदार दाते, मानवी हक्काचे उद्‌गाते
दलितोद्धारक युगनिर्माते, घटनेचे तर शिल्पकार ते
'भारतरत्न' भाग्यविधाते आम्हा मुखी म्हणवियेले
नव्या युगाचे नव्या मनुचे दर्शन सर्वा दावियले
'ज्ञानबा तुकाराम' बोला त्याचा, कंठरवाने करा जयजयकार
बाबासाहेब आंबेडकर जय, जय मूकनायक आंबेडकर

# ३५. वनराई गाई अंगाई

वनराई गाई अंगाई
करा ग बाई तुम्ही घाई
बाई, कृष्ण हवा, आम्हा कान्हा हवा
मुरलीमनोहर श्याम हवा ॥

बाऊ प्रगतीचा कशास काई
वनसंहारे जगती खाई
धरती, सरिता गंगा माई
बाळकृष्णावीण सुकून जाई ॥

बल्लवांच्या कामधेनू गाई
गोकुळ दुधाचं कुठ ग बाई
मुरलीध्वनीवीण आटून जाई
पद्मजावर प्रेमे गाई ॥

## आल्हाददायी 'चांदण्यांचे झाड'

❁ 'चांदण्यांचे झाड' हा श्री. कमलाकर दत्ताराम म्हाळशी यांच्या आजवरच्या जीवन-चिंतनाचा हृदयंगम आविष्कार आहे. हे 'झाड' एकाएकी 'चांदण्यांनी' लखडलेले नाही. या 'झाडाने' तप्त सूर्याचा लाव्हा झेललेला आहे. जीवनानुभवांच्या मुशीतून हे 'झाड' प्रगल्भ झालेले आहे.

❁ 'चांदण्यांच्या झाडाला' आत्मनिष्ठेचा प्रांजळ सूर लाभलेला आहे, सामाजिक जाणिवेचे डोळस अधिष्ठान आहे. श्रद्धास्थानांच्या ओलाव्याने हे झाड परिपुष्ट झालेले आहे. राष्ट्रीय विचारांच्या मंत्रजागरामुळे हे झाड भावमंत्रित झालेले आहे. हे झाड स्पंदनशील आहे, संस्कारबहुल आहे. स्वप्न-वास्तवाच्या हिंदोळ्यावर झोके घेत, ऊन-पावसाचा मारा सहन करीत हे झाड आपल्याच मस्तीत आपल्या अंगभूत सौंदर्याच्या अनेक कळांनी रसिकांना आल्हाद देत आहे, अंतर्मुख करीत आहे.

❁ सुखदुःखसंमिश्र, कटु-गोड अनुभवांच्या पाऊलखुणा या कवितासंग्रहात अधूनमधून आढळतात.

❁ 'चांदण्यांचे झाड' मध्ये अनेक भाववृत्तींचे विलोभनीय इंद्रधनुष्य आहे. जीवनातील अनेक रंगछटांचे त्यात दर्शन घडते.

**डॉ. सोमनाथ दत्ता कोमरपंत**

ॐ श्री दत्त पद्मजा प्रकाशन

Cover Printed at : **Samrat Printers,** Banastarim, Goa. Ph : (0832) 287755.